महाराष्ट्र शासन

आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्र.-आस्थापना १०८३/प्र.क्र.४९(एक)/का.१
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२
दिनांक - १ ऑगस्ट, १९८४.

वाचा :- शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्रमांक-टीएसपी १०८३/१३०/डी.२, दि. २ जून, १९८३.

शासन निर्णय:-आदिवासींच्या सर्वांगिण विकासाच्या योजनांची जलद गतीने अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीकोनातून शासनाने मंत्रालयीन पातळीवर आदिवासी विकास विभाग नावाचा नवीन विभाग निर्माण करण्याचा निर्णय घेतला. त्यानुसार पूर्वीच्या समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभागामधून किमान आवश्यक तेवढा कर्मचारीवर्ग घेऊन दि. १-६-१९८३ पासून आदिवासी विकास विभाग मंत्रालयात अस्तित्वात आला. नवीन विभागाकडे उपरोक्त शासन निर्णयाद्वारे समाजकल्याण, विभागाकडून एकूण ८० पदे हस्तांतरीत करण्यात आली. आदिवासींच्या विकासाच्या सर्व योजना या विभागाकडे हस्तांतरीत करण्यांत आल्यामुळे या नवीन विभागाकडे हस्तांतरीत करण्यांत आलेल्या आदिवासी विकासाच्या योजनांची अंमलबजावणी वेळेवर व परिणामकारक व्हावी यासाठी मंत्रालयीन पातळीवर वाढलेल्या कामकाजासाठी या विभागाची पुनर्रचना करण्याच्या दृष्टीने तात्काळ काही जादा पदे निर्माण करणे आवश्यक होते व त्या संबंधीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता, त्यावर विचार होवून शासन आता आदिवासी विकास विभागात मंत्रालय पातळीवर खालीलप्रमाणे कर्मचारी वर्गाची जादा पदे दि. २८ फेब्रुवारी, १९८५ रोजी संपणा-या कालावधी-करिता ताबडतोब निर्माण करण्यास मंजुरी देत आहे. ही पदे या पुढच्या कालावधीसाठी वेळोवेळी चालू ठेवण्याबाबत आदेश काढण्यात येतील.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतनमान |
|---|---|---|---|
| [१] | अधीक्षक | ६ | ५००-२०-७००-२५-९०० |
| [२] | सहाय्यक | १२ | ३६५-१५-५००-२०-६६०-विस्तार-२०-७६०. |
| [३] | लिपिक | १० | २६०-१०-३९०-१५-४२०-विस्तार-१५-४९५. |
| [४] | रोखपाल | १ | २६०-१०-३९०-१५-४२०-विस्तार-१५-४९५-[+] दरमहा रुपये ५० विशेष वेतन. |

| | | | |
|---|---|---|---|
| [५] | देयक लिपिक | २ | २६०-१०-३९०-१५-४२०-विस्तार-१५-४९५-[+] दरमहा रुपये २० विशेष वेतन. |
| [६] | टंकलेखक | २ | २९०-१०-३९०-१५-४६५-विस्तार-१५-५४०. |
| [७] | चपराशी | ३ | २००-३-२३०-५-२५५-विस्तार-५-२८० |
| | एकूण पदे | ३६ | |

0-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-=-0

२. ही पदे धारण करणा-या व्यक्ती नियमानुसार वेळोवेळी मिळणा-या महागाई भत्त्याच्या वाढी व इतर देय भत्ते मिळण्यास पात्र ठरतील.

३. उपरोक्त कर्मचारी वर्गाच्या वेतन व भत्त्यासाठी लागणारा आवर्ती खर्च रुपये १,५०,०००/- [ रु. एक लक्ष पन्नास हजार मात्र ] व तसेच फर्निचर कार्यालयीन खर्च व टंकलेखन यंत्रे खरेदी इत्यादीकरिता लागणारा अनावर्ती खर्च रु. ६७,०००/- [रु. सदुसष्ट हजार मात्र] यांस शासन मंजूरी देत आहे..

४. उपरोक्त खर्च लेखाशीर्ष "२७६-सचिवालय-सामाजिक व सामूहिक सेवा-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-जनजाती क्षेत्र उपयोजना आय-सचिवालय-[एक] मंत्रालयातील कर्मचारी वर्गावरील खर्च [ए] राज्य योजनांतर्गत योजना [२७६ ००१ ६] मागणी क्र. २०१" या खाली खर्ची टाकण्यांत यावा. व तो आदिवासी विकास विभागाच्या १९८४-८५ च्या अर्थ संकल्पात वरील बाबीसाठी महाराष्ट्र विनियोजन [ दुसरा पुरवणी ] अधिनियम १९८४ (१९८४ चा अधिनियम क्र.सतरा) द्वारे करण्यांत आलेल्या रुपये २,१७०००/-[ रुपये दोन लक्ष सतरा हजार ] तरतुदीतून भागविण्यांत यावा.

५. हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्र. डीआर-१००९/८४/ इक्सपी-११, दिनांक-१५ जून, १९८४ अन्वये निर्गमित होत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल याचे आदेशानुसार व नांवाने

[ मा. सिं. चौधरी ]
सहाय्यक सचिव.

प्रत,

सचिव व आदिवासी विकास आयुक्त, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

महालेखापाल, महाराष्ट्र १, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई [ ५ प्रती ]
निवासी लेखा अधिकारी, मुंबई [ २ प्रती ]
वित्त विभाग [ व्यय-११ ], मंत्रालय, मुंबई.
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
लेखा शाखा, आदिवासी विकास विभाग [ १० प्रती ]
सर्व कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय.
निवड नस्ती, कार्यासन १.

-=०=-

<u>हेमंत</u>